गृह विभागाच्या सायबर प्रकल्पासाठी (Cyber Initiative of Mumbai police) प्रशासकीय आणि वित्तीय बाबींच्या पुर्ततेसाठी एक उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०१५/प्र.क्र.६४/विशा-३ अ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, २ रा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १८ जून २०१५.

वाचा : मा. मुख्यमंत्री महोदयांचे पत्र क्र. मुमंस/ प्रशासन कक्ष/ ३१/ जावक क्र.१३६/२०१५, दि.०६.०६.२०१५

**प्रस्तावना**

सायबर गुन्ह्यांचे वाढते प्रमाण व त्याचा सामान्य जनमानसावर होणारा परिणाम यांवर प्रभावी उपाययोजना करण्यासाठी सायबर संबंधित प्रकल्प शासन स्तरावर राबविण्याची कार्यवाही करण्यात येत आहे. सदर प्रकल्पाच्या वित्तीय तसेच प्रशासकीय बाबींच्या अंमलबजावणीकरीता अपर मुख्य सचिव (गृह विभाग) यांच्या अध्यक्षतेखाली एक उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:

सायबर संबंधित प्रथमतः मुंबईच्या स्तरावर व तदनंतर संपुर्ण राज्यस्तरावर सायबर प्रकल्प राबविण्यात येत आहे. सदर प्रकल्पाचे कार्यान्वयन शीघ्रतेने व्हावे, या अनुषंगाने प्रकल्पाच्या प्रशासकीय तसेच वित्तीय बाबींचा विचार करून शासनास शिफारस करण्यासाठी अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली एक उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समिती गठीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. या समितीची रचना खालीलप्रमाणे आहे.

| क्र. | अधिकाऱ्यांचे पदनाम | समितीवरील पद |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव (गृह) | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव (वित्त) | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव (नियोजन) | सदस्य |
| ४ | पोलीस आयुक्त, मुंबई | सदस्य |
| ५ | अपर पोलीस आयुक्त (गुन्हे), मुंबई | सदस्य सचिव |

२. या समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील :-

१. विषयांकित प्रकल्पासाठी प्रशासकीय बाबी जसे अंमलबजावणीचे अधिकार मुंबई पोलीस आयुक्तांना देणे, याकरिता लागणारे अतिरिक्त मनुष्यबळ पोलीस दलांतर्गत किंवा आऊटसोर्सिंगद्वारे उपलब्ध करता येईल किंवा कसे याबाबत निर्णय घेणे इत्यादी.

२. सायबर प्रकल्पासंदर्भात संबंधित इतर अन्य सर्व प्रशासकीय बाबी.

३. प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी होणारा आवर्ती तसेच अनावर्ती खर्च तसेच इतर अन्य वित्तीय बाबी याचा अभ्यास करून प्रस्ताव मंत्रीमंडळाच्या मान्यतेसाठी सादर करणे.

४. प्रस्तावास मंत्रिमंडळाची मान्यता घेऊन आगामी विधिमंडळ अधिवेशनात प्रस्ताव अर्थसंकल्पित करणे व त्याची अंमलबजावणी करणे.

विभागांतर्गत सायबर संबंधित सर्व प्रकल्पांबाबत सदर समितीचा निर्णय अंतिम राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१७१६१००४८९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Dagadu Khedekar

Digitally signed by Sanjay Dagadu Khedekar
DN: CN = Sanjay Dagadu Khedekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.06.18 12:34:55 +05'30'

**(सं. द. खेडेकर)**
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय मुंबई,
२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय मुंबई,
३. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय मुंबई,
४. मा. मुख्यमंत्री महोदयांचे, प्रधान सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, (अ. व सु.), गृह विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, (विशेष), गृह विभाग, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. पोलीस आयुक्त, मुंबई,
९. अपर पोलीस आयुक्त, गुन्हे, पोलीस आयुक्तालय, मुंबई
१०.उपसचिव, विशा-३ अ, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
११.निवडनस्ती/गृह विभाग (विशा-३ अ).